भविष्य निर्वाह निधीच्या वर्गणीदारांसाठी
ठेव संलग्न विमायोजनेमध्ये सुधारणा.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक- भनिनि-१००३/प्र.क्र.४४/२००३/१३-अ,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक- १ डिसेंबर, २००३ .

**शासन निर्णयः-**

भविष्य निर्वाह निधी वर्गणीदारांच्या कुटुंबियांना विशेष सामाजिक सुरक्षा मिळावी आणि शासकीय कर्मचा-यांना त्यांच्या भविष्य निर्वाह निधीमधील बचत वाढविण्यास उत्तेजन मिळावे या हेतूने ठेव संलग्न विमा योजना, महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियमावलीतील नियम-३० मध्ये अंतर्भूत करण्यात आलेली आहे.

२. पाचव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार शासकीय कर्मचा-यांना दि.१/१/१९९६ पासून सुधारित वेतनश्रेणी लागू करण्यात आली आहे . त्यामुळे महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियमातील नियम-३० मध्ये नमूद करण्यात आलेल्या ठेव संलग्न विमा योजनेच्या या संदर्भातील वित्तीय मर्यादेमध्ये बदल करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. या मर्यादा खालीलप्रमाणे सुधारण्यात येत आहेत :-

(अ) या योजनेखालील अतिरिक्त देय रकमेच्या कमाल मर्यादेत वाढ करण्यात येत असून, ही मर्यादा रुपये३०,०००/- वरुन रुपये ६०,०००/- इतकी वाढविण्यात येत आहे.

(ब) वरील कमाल मर्यादेच्या अनुषंगाने या योजनेखालील अतिरिक्त देय रक्कम मिळण्यास पात्र होण्यासाठी शासकीय कर्मचा-यांच्या मृत्युलगत पूर्वीच्या ३ वर्षामध्ये त्याच्या भविष्य निर्वाह निधी खात्यामध्ये शिल्लकीची किमान मर्यादा देखील खालील प्रमाणे वाढविण्यात येत आहे :-

(१) वर्गणीदाराने मृत्युलगत पूर्वीच्या ३ वर्षामधील जास्तीत जास्त कालावधी ज्या पदावर व्यतीत केला असेल त्या पदांच्या वेतनश्रेणीची कमाल मर्यादा रुपये १२,०००/- किंवा त्याहून अधिक असल्यास त्याच्या खात्यावरील शिल्लक उक्त ३ वर्षात कोणत्याही वेळी रुपये २५,०००/- पेक्षा कमी नसावी.

(२) वर्गणीदाराने मृत्युलगत पूर्वीच्या ३ वर्षामधील जास्तीत जास्त कालावधी ज्या पदावर व्यतीत केला असेल, त्या पदाच्या वेतनश्रेणीची कमाल मर्यादा रुपये ९,०००/- किंवा त्याहून अधिक परंतू १२,०००/- पेक्षा कमी असल्यास, खात्यावरील शिल्लक उक्त ३ वर्षात कोणत्याही वेळी रुपये १५,०००/- पेक्षा कमी नसावी.

(३) वर्गणीदाराने मृत्युलगत पूर्वीच्या ३ वर्षामधील जास्तीत जास्त कालावधी ज्या पदावर व्यतीत केला असेल, त्या पदाच्या वेतनश्रेणीची कमाल मर्यादा रुपये ३,५००/- किंवा त्याहून अधिक परंतू ९,०००/- पेक्षा कमी असल्यास, खात्यावरील शिल्लक उक्त ३ वर्षात कोणत्याही वेळी रुपये १०,०००/- पेक्षा कमी नसावी.

(४) वर्गणीदाराने मृत्युलगत पूर्वीच्या ३ वर्षामधील जास्तीत जास्त कालावधी, ज्या पदावर व्यतीत केला असेल, त्या पदाच्या वेतनश्रेणीची कमाल मर्यादा रुपये ३,५००/- पेक्षा कमी असल्यास, खात्यावरील शिल्लक उक्त ३ वर्षात कोणत्याही वेळी रुपये ६,०००/- पेक्षा कमी नसावी.

३. हे आदेश दिनांक १/१२/२००३ पासून अंमलात येतील.

४. परंतू हे आदेश निर्गमित झाल्यानंतर ३ वर्षाच्या कालावधीत एखादया वर्गणीदाराचा मृत्यू झाल्यास त्याला त्याच्या खात्यावरील कमीत कमी शिल्लक रक्कमेविषयक शर्तीमुळे हे सुधारीत आदेश लागू होत नसतील, तर

ROTA PRINT/H-953(4000-12-03)1

(P.T.O.

त्याचे प्रकरणी या पुर्वीचे महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियम, १९९८ मधील नियम ३० लागू करावेत व सदर नियमानुसार देय असलेले फायदे संबंधितास द्यावेत.

५. महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियमामध्ये या प्रमाणे सुधारणा करण्याची अधिसूचना यथावकाश प्रसिध्द करण्यात येईल. भविष्य निर्वाह नियम ३० मधील इतर अटींच्या अनुषंगाने या आदेशाची अंमलबजावणी करावी.

सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४६२/०३/सेवा-२,दि.२४/९/०३ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(मि.रा.वाढवे.)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई (१० जादा प्रतींसह)
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर (१० जादा प्रतींसह)
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई (१० जादा प्रतींसह)
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर ( १० जादा प्रतींसह)
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ न्यायशाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई.
वरीष्ठ उप महालेखापाल, भविष्य निर्वाह निधी कक्ष ,
ब्रिजवासी बिल्डींग, सोनवाला रोड, गोरेगांव, मुंबई-४०० ०६३
(५० जादा प्रतींसह)
मुख्य लेखा परीक्षक, निवासी लेखे, कोकण भवन, नवी मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
ग्राम विकास विभाग / नगर विकास विभाग/ वित्त विभाग (सेवा-२) ,
मंत्रालयाचे इतर सर्व विभाग,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई ( प्रसिध्दी पत्रक काढण्यासाठी)
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असलेले सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
मंत्रालय मध्यवर्ती ग्रंथालय, मंत्रालय,मुंबई ( २ प्रती ),
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.
निवड नस्ती.
* पत्राने.

-------